उरण एस. टी. स्टॅड चारफाटा ते बोकडविरा (चारफाटा) पोलीस चौकी रस्ता राज्यमार्ग क्र.१०३ रस्ता हस्तांतरीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.५४/नियोजन-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- ११ मार्च, २०२०.

पहावे :- १) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/रस्ते हस्तांतरण-१३९/४२३,दि.१९/०१/२०१८.
२) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/रस्ते हस्तांतरण-१३९/६६९४,दि.११/१२/२०१८.
३) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/रस्ते हस्तांतरण-१३९/३१८६,दि.०३/१०/२०१९.
४) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/रस्ते हस्तांतरण-१३९/३५२९,दि.११/११/२०१९.
५) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांचे पत्र जा.क्र.मुअ(मुं)/रेखाचित्र शाखा/रस्ते हस्तांतरण-१३९/८९,दि.०९/०१/२०२०.

प्रस्तावना :-

मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी संदर्भाधीन पत्रान्वये उरण एस. टी. स्टॅड चारफाटा ते बोकडविरा (चारफाटा) पोलीस चौकी रस्ता राज्यमार्ग क्र.१०३ रस्ता सिडकोकडे हस्तांतरीत करणेबाबत विनंती केली आहे. तसेच उपरोक्त रस्ता सा.बां.विभागाकडून सिडको प्रशासनाकडे हस्तांतरीत करण्यास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी मंजूरी दिलेली आहे. त्यानुषंगाने सदर रस्ता सिडको प्रशासनाकडे हस्तांतरीत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**<u>शासन निर्णय :-</u>**

उरण एस. टी. स्टॅड चारफाटा ते बोकडविरा (चारफाटा) पोलीस चौकी रस्ता राज्यमार्ग क्र.१०३ रस्ता, साखळी क्रमांक ०/०० ते ६/५००, एकूण लांबी ६.५०० कि.मी. आहे.

उरण एस. टी. स्टॅड चारफाटा ते बोकडविरा (चारफाटा) पोलीस चौकी रस्ता राज्यमार्ग क्र.१०३ हा रस्ता सिडकोकडे खालील अटींच्या अधीन राहून हस्तांतरीत करण्यात येत आहे.

१) हस्तांतरीत करण्यात येणाऱ्या रस्त्याच्या जागेचा मालकी हक्क सा.बां.विभागाकडे राहील.

२) सिडकोमार्फत रस्त्याच्या सुधारणेच्या/पुर्नबांधणीच्या तांत्रिक प्रस्तावास सिडकोने सार्वजनिक बांधकाम विभागाच्या मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांची सर्व साधारण मंजूरी प्राप्त करून घ्यावी या मंजूरीप्रमाणे काम करण्याची जबाबदारी सिडको प्रशासनाची राहील. सदर काम भारतीय रस्ते महासभेने (IRC) निश्चित केलेल्या मानकांप्रमाणे करणे आवश्यक राहील.

३) हस्तांतरीत करण्यात येणाऱ्या रस्त्याच्या लांबीलगत भविष्यात मागणी करण्यात येणारे अकृषक ना हरकत दाखले, पोच रस्ता ना हरकत दाखले व इतर तत्सम दाखले सिडको प्रशासनामार्फत देण्यात यावेत. सदर दाखले देतांना शासनाच्या प्रचलीत नियमांचे पालन करण्याची जबाबदारी सिडको प्रशासनाची राहील.

४) हस्तांतरीत करण्यात येणाऱ्या रस्त्याच्या लांबीमध्ये कोणत्याही प्रकारचे अतिक्रमण होणार नाही याबाबतची संपूर्ण जबाबदारी सिडको प्रशासनाची राहील.

५) हस्तांतरीत करण्यात येणाऱ्या रस्त्याच्या लांबीमध्ये रस्त्यालगत उभारण्यात येणाऱ्या जाहीरात फलकांना परवानगी देणे व महसूल जमा करण्याबाबतचे अधिकार सार्वजनिक बांधकाम विभागाकडे राहतील.

६) रस्त्याच्या लांबीमध्ये पुलाचे रूंदीकरण करणे/ पुर्नबांधणी करणे इत्यादी बाबी हाताळणे आवश्यक झाल्यास सदर कामे तसेच रस्ता देखभाल व दुरूस्तीची कामे सिडकोच्या निधीतून करण्यात यावीत.

७) सदर रस्ता सिडको यांचेकडे हस्तांतरीत करण्यात आल्यानंतर रस्त्याच्या लांबीच्या वार्षिक विवरणपत्रात योग्य ते बदल शेरे नमुद करण्यात यावेत.

८) हस्तांतरीत करण्यात येत असलेला रस्ता सिडको यांचे ताब्यात दिल्याचा दिनांक शासनास योग्य वेळी कळविण्यात यावा.

९) रस्ता हस्तांतरीत केल्यानंतर त्यावरील अतिक्रमणे/ लीज बांधकाम, कंत्राट अथवा इतर संलग्न विषयाची हाताळणी करण्याची जबाबदारी सिडकोकडे राहील.

१०) सिडको यांनी सदर रस्त्यावरील न्यायालयीन आदेश असल्यास त्याचा अवमान होणार नाही याची दक्षता घ्यावी. संबंधित न्यायलयीन प्रकरणाची कागदपत्र प्राप्त करून योग्य ती कार्यवाही करण्याची जबाबदारी सिडको प्रशासनाची राहील.

११) भविष्यात आवश्यकतेनुसार सदर रस्ता रा.मा.१०३ पुन्हा सा.बां.विभागाच्या ताब्यात दयावयाचा निर्णय झाल्यास सदर रस्ता सुस्थितीत सा.बां.विभागाच्या ताब्यात देण्याची जबाबदारी सिडको प्रशासनाची राहील व याबाबत कोणत्याही प्रकारच्या रस्त्यावर कामे केल्याबाबतच्या निधीची मागणी/दावे/खर्चाची मागणी इत्यादी मान्य होणार नाही.

वरील अटींच्या अधीन राहून उरण एस. टी. स्टॅड चारफाटा ते बोकडविरा (चारफाटा) पोलीस चौकी रस्ता राज्यमार्ग क्र.१०३ एकूण लांबी ६.५०० कि.मी. हा रस्ता सिडको प्रशासनाकडे हस्तांतरीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३१११११३२५७७८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2020.03.11 11:37:12 +05'30'

**(प्रशांत पाटील)**

**अवर सचिव (नियोजन),महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) शहर व औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित (सिडको).

२) मुख्य अभियंता सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

३) विभागीय आयुक्त, मुंबई.

४) अधिक्षक अभियंता,मुंबई बांधकाम मंडळ, रायगड (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)

५) जिल्हाधिकारी, रायगड.

६) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पनवेल.

७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई

८) रेखाचित्र शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.

१०) निवडनस्ती.